★ नाशिक, बुधवार, १८ फेब्रुवारी २०१५ । किंमत ₹ ३ ■ पाने १६ (१२ + ४)

www.esakal.com f facebook.com/SakalNews Call Ce

सकाळ

युरोपीय एअरलाइन्समध्ये 'वाय-फाय' युद्ध

पान ११



अग्रलेख : नवा 'सेतू', नवी 'ऊर्जा' ...........पान ६ वर

नाशिक। कोल्हापूर। पुणे। मुंबई।




# नाशिकमध्ये उभारायचेय कलादालन



सिद्धार्थ रवींद्र धारणे (चित्रकार)

**चित्रकलेच्या माध्यमातून नाशिकचा पुरातन इतिहास येथे येणाऱ्या पर्यटकांना माहीत व्हावा, यासाठी तोलामोलाच्या कलादालनाची शहरात नेहमी उणीव भासते. ती उणीव शासनाने भरून काढण्याची गरज आहे. मात्र, त्या दृष्टीने विचार होताना दिसत नाही. त्यामुळे नाशिकच्या इतिहासाला चित्रकलेतून झळाळी देणारे कलादालन मुंबई नाका येथे उभारण्याचा मानस चित्रकार सिद्धार्थ धारणे यांनी 'मनमोकळं'मधून व्यक्त केला आहे.**

– हेमा नवले

**प्रश्न : चित्रकलेकडे कसे वळलात?**

**सिद्धार्थ धारणे :** शालेय जीवनापासूनच चित्रकलेची आवड आहे. चित्र हे माझे कौशल्य असून, त्यात रमण्याचा मला छंद आहे. चित्रकलेविषयी अधिक जाणून घेण्याच्या जिज्ञासेतून अनिकेत महाले यांच्याकडे तीन वर्षे क्लास केले. चित्र काढण्याची देणगी दैवी असून, ती आयुष्यभर जोपासणार आहे.

**प्रश्न : चित्रकलेत किती पारितोषिके मिळवली?**

**श्री. धारणे :** मला पहिले पारितोषिक पाचवीत असताना पुणे येथे भरलेल्या अखिल भारतीय जलसाहित्य संमेलनात मिळाले. त्यात ७०० शाळा सहभागी झाल्या होत्या. त्यात मी प्रथम स्थान प्राप्त केले. तीन राष्ट्रीय, १२ राज्यस्तरीय आणि आठ जिल्हास्तरीय पारितोषिके मला मिळाली आहेत. कलेसाठी दिला जाणारा 'गंगा-गोदावरी' पुरस्कार मला दोनदा मिळाला आहे.

**प्रश्न : चित्रकलेची आवड जोपासताना अभियांत्रिकीकडे कसे वळलात?**

**श्री. धारणे :** अभियांत्रिकी हे माझे प्रोफेशन आहे, तर चित्रकला हे माझे हृदय आहे. अभियांत्रिकी क्षेत्रात करिअर केले असले, तरी माझी चित्रकला लोप पावणार नाही.

**प्रश्न : एखादा अविस्मरणीय क्षण?**

**श्री. धारणे :** मी दहावीत असताना जिल्हाधिकारी कार्यालयातर्फे आपत्ती व्यवस्थापन चित्रकला स्पर्धा घेण्यात आली होती. त्यात माझ्या शाळेचे मी प्रतिनिधित्व केले. या ठिकाणी १३ मिनिटांत काढलेल्या चित्रासाठी अनपेक्षितपणे मला पहिले बक्षीस देण्यात आले. त्याच चित्राला तीन हजार रुपये देणगीही मिळाली. हा क्षण माझ्यासाठी अविस्मरणीय असा आहे.

**प्रश्न : कलेच्या क्षेत्रात काय बदल होणे अपेक्षित आहे?**

**श्री. धारणे :** वैयक्तिक पातळीवर विचार केल्यास नाशिकमध्ये चित्र काढण्यासाठी अतिशय उत्तम विषय मिळतात. त्यासाठी जागा व वातावरणही चांगले आहे. विशिष्ट कलादालन उपलब्ध व्हावे, जेणेकरून नाशिकमध्ये येणाऱ्या पर्यटकांना कलाकारांच्या कलाकृतीतून येथील इतिहास पाहता येईल. वेगवेगळी प्रदर्शने भरविली गेली पाहिजेत. कलाकारांना आत्मविश्वास मिळाल्यास त्यांच्या कलेला वाव मिळतो. मुंबईतील जहाँगीर कलादालनाप्रमाणे नाशिकमध्येही मोठे दालन व्हायला हवे. त्यासाठी मी माझ्या क्षमतेनुसार मुंबई नाका येथे कलादालन उभारणार असून, त्यासाठीचा पाठपुरावा सुरू आहे.

**प्रश्न : चित्रकलेविषयी काय सांगाल?**

**श्री. धारणे :** चित्रांमध्ये हाताने काहीतरी रेखाटल्याचा आनंद वेगळाच असतो. आपल्या स्वतःच्या भावना त्यात मांडता येतात. तशी भावना वेस्टर्न चित्रात नसते, हे लोकांनी ओळखले पाहिजे. रिॲलिस्टीकला महत्त्व न देता पळत्या चित्रांना महत्त्व दिले जाते. जितके खरे चित्र काढू, तेवढा वेळ खर्च करावा लागतो आणि मेहनत घ्यावी लागते. हेच महत्त्व रसिकांनी ओळखले पाहिजे.

The Daily Sakaal, Wednesday, 18 February 2015